**कोषागारातून रोख देय अनुदान**
केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन (ग्रामीण) अंतर्गत अनुसुचित जमाती उपयोजना घटकासाठी जागतिक बँक सहाय्यित कामगिरी आधारीत प्रोत्साहन अनुदान वितरण करणेबाबत.
**(लेखाशीर्ष २२१५ ९८६२)**

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः स्वभामि-२०२०/प्र.क्र.९५/पापु-१६

७ वा मजला, जी.टी.रूग्णालय संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
तारीख: ०५ ऑक्टोबर,२०२०

**वाचा:**

१. केंद्र शासनाचे मंजूरी आदेश:क्र.S-१८०१३/२/२०१४-O/oDir(SBM)-Part(१),दिनांक: ०३/०७/२०२०.
२. वित्त विभाग,शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक-१६ एप्रिल,२०२०.
३. वित्त विभाग,शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दिनांक-४ मे,२०२०.
४. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक: बीयुडी-२०२०/प्र. क्र.१०/कार्यासन ६, दिनांक: ०९ सप्टेंबर, २०२०.

**प्रस्तावना :**

उपरोक्त वाचा येथील केंद्र शासनाच्या पेयजल व स्वच्छता मंत्रालयाच्या मंजूरी आदेशान्वये राज्य शासनास केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन (ग्रा) अंतर्गत अनुसुचित जमाती घटकासाठी जागतिक बँक सहाय्यित कामगिरी आधारीत प्रोत्साहन अनुदानाकरिता एकूण रुपये २७९७.५३ लक्ष (रूपये सत्तावीस कोटी, सत्त्याण्णव लक्ष, त्रेपन्न हजार फक्त ) एवढा निधी वितरित करण्यात आलेला आहे. सदर निधी राज्याच्या एकत्रित निधीत जमा झाल्याचे वित्त विभागाने कळविले आहे. उपरोक्त वाचा २ अन्वये रुपये २७९७.५३ लक्ष इतका निधी अर्थसंकल्पिय प्रणालीद्वारे वितरण करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. सदर उपलब्ध निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन (ग्रा) योजनेंतर्गत सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरिता अनुसुचित जमाती घटकासाठी जागतिक बँक सहाय्यित कामगिरी आधारीत प्रोत्साहन

अनुदान एकूण रुपये २७९७.५३ लक्ष (रूपये सत्तावीस कोटी, सत्याण्णव लक्ष, त्रेपण हजार फक्त ) इतका निधी वितरणासाठी अर्थसंकल्पिय प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आला आहे. अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या सदर रुपये २७९७.५३ लक्ष (रूपये सत्तावीस कोटी, सत्त्याण्णव लक्ष, त्रेपन्न हजार फक्त) इतका निधी जागतिक बँक सहाय्यित कामगिरी आधारित प्रोत्साहन अनुदानाकरिता राज्यस्तरावर उघडण्यात आलेल्या बँक खात्यात जमा करण्याबाबत शासन मान्यता देण्यात आहे.

०२. उपरोक्त प्रमाणे रुपये २७९७.५३ लक्ष (रूपये सत्तावीस कोटी, सत्याण्णव लक्ष, त्रेपण हजार फक्त ) एवढी रक्कम आहरण व संवितरण अधिकारी तथा वित्त नियंत्रक, रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडे BEAMS प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. सदर रक्कम रुपये २७९७.५३ लक्ष (रूपये सत्तावीस कोटी, सत्त्याण्णव लक्ष, त्रेपन्न हजार फक्त ) अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई यांच्या कार्यालयातून आहरीत करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी तथा वित्त नियंत्रक, रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२) (श्रीम.सुनिता केसकर), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना व नियंत्रक अधिकारी म्हणून सह सचिव तथा प्रकल्प संचालक, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष (श्री.अभय महाजन), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर रक्कम रुपये २७९७.५३ लक्ष (रूपये सत्तावीस कोटी, सत्त्याण्णव लक्ष, त्रेपन्न हजार फक्त) इतकी आहरण व संवितरण अधिकारी तथा वित्त नियंत्रक, रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२), (श्रीम.सुनिता केसकर),पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय, मुंबई यांनी अधिदान व लेखाधिकारी,मुंबई यांच्या कार्यालयातून आहरीत करून स्वतंत्र धनादेशान्वये प्रकल्प संचालक, (स्वच्छ भारत मिशन) राज्य पाणी व स्वच्छता मिशन, नवी मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे."

०३. या शासन निर्णयाद्वारे मुक्त केलेली रक्कम पुढील अटींवर मंजूर करण्यात येत आहे.

अ) या शासन निर्णयाद्वारे मुक्त केलेला निधी, या कार्यक्रमासाठी उघडलेल्या स्वतंत्र बँक खात्यात जमा करण्यात यावा.

आ) सदर निधी खर्च करण्याबाबत केंद्र शासनाने ठरवून दिलेल्या मार्गदर्शक सुचनांमधील तरतूदींनुसार जिल्हा परिषदांना वितरीत करण्याबाबत स्वतंत्र आदेश निर्गमित करण्यात येतील.

इ) सदर रक्कम खर्च करताना वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०२०/प्र.क्र.६४/ अर्थ-३, दिनांक १६ एप्रिल,२०२० व क्र. अर्थसं २०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३,दिनांक ०४ मे,२०२० मधील अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करून आवश्यक बाबींची पूर्तता करून कार्यपूर्ती अहवाल/नमूद प्रमाणपत्रे शासनास त्वरीत सादर करावीत.

ई) आदिवासी विकास विभागाच्या दि. ०९ सप्टेंबर, २०२० च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.५ अन्वये आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करून दिलेली तरतूद फक्त आदिवासी लाभार्थ्यांकरिता व आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तथापि आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेर केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी वैयक्तिक लाभार्थ्यांकरिताच खर्च करण्यात यावी.

४. हा खर्च "मागणी क्रमांक वाय-०५, २२१५-पाणी पुरवठा व स्वच्छता, जनजाती क्षेत्र उपयोजना, जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना, (०२) मलप्रणाल व स्वच्छता, ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (०३) स्वच्छ भारत अभियानांतर्गत वैयक्तिक शौचालय बांधकामे (केंद्रीय) (कार्यक्रम), (२२१५ ९८६२) ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर)" या लेखाशीर्षाखाली घालावा.

०५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०२०/प्र.क्र.६४/ अर्थ-३, दिनांक १६एप्रिल,२०२० अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तींच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रक क्र.अर्थसं २०२०/प्र.क्र.६४/ अर्थ-३, दिनांक १६ एप्रिल,२०२० च्या परिपत्रकातील सूचनांचे तसेच परिशिष्टातील अ.क्र.९ मधील तपासणीसुचीतील अ.क्र.१ ते १० मधील लागू असलेल्या अटी व शर्तींची पुर्तता होत असल्याचे प्रमाणीत करण्यात येत आहे.

५. वित्त विभागाच्या दिनांक १८/०५/२०२० च्या शासन परिपत्रकानुसार उपरोक्त रुपये २७९७.५३ लक्ष (रूपये सत्तावीस कोटी, सत्त्याण्णव लक्ष, त्रेपन्न फक्त ) एवढा निधी राज्याच्या एकत्रित निधीत जमा झाल्याबाबत दिनांक १०/०७/२०२०च्या ई-मेलद्वारे वित्त विभागाकडून कळविण्यात आलेल आहे. सदर निधी अनुसुचित जमाती प्रवर्गासाठी वित्त विभागाच्या शासन निर्णय/परिपत्रकाच्या अधिन राहून खर्च करण्याबाबत उपरोक्त वाचा २ येथील आदिवासी विकास विभागाच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१००५१३३२१११७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Smita Sachin Rane

Digitally signed by Smita Sachin Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f85d92aa99ea42eb86747707e3c3a129af986c1f95f6bc3e8165ceaf5155e6e7, serialNumber=4b9befd340493837db4cffafa6b96eeaf6aa3c12a7a6bf0467b0f517b724e8ee, cn=Smita Sachin Rane
Date: 2020.10.05 15:05:55 +05'30'

**(स्मि.स.राणे)**

कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता ) यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता ) यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. विभागीय आयुक्त, सर्व.
५. महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ मुंबई/नागपूर (लेखा परीक्षा व अनुज्ञेयता).
६. सहसचिव तथा प्रकल्प संचालक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. उपायुक्त, विकास/आस्थापना, सर्व विभागीय आयुक्त यांचे कार्यालय.
८. जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती सर्व.
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
१०. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
११. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/नागपूर.
१२. प्रकल्प संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई.
१३. उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पा. व स्व.), जिल्हा परिषद, सर्व.
१४.जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
१५.मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
१६. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग (विघयो), मंत्रालय, मुंबई.
१७. नियोजन विभाग, (का.क्र.१४४३), मंत्रालय, मुंबई.
१८. वित्त विभाग, (व्यय-३), मंत्रालय, मुंबई.
१९. कार्यासन क्र.पापु-०४, पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. निवड नस्ती, कार्यासन पापु-१६, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.